अर्थसंकल्पिय अनुदान सन २०१६-२०१७
“२२१५ पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१) (०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना ( २२१५ १८४३)” मागणी क्रमांक वाय

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०१६/प्र.क्र.१४०/पापु-२३

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख : ३० मार्च, २०१७

**वाचा :-**

१) **शासन निर्णय,वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१६/प्र.क्र.८०/अर्थसंकल्प-३,दि.१ एप्रिल, २०१६**
२) **शासन परिपत्रक,वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २० एप्रिल, २०१६**
३) **शासन निर्णय, पा.पु.व स्व.वि.क्रमांकः बजेट-२०१६/प्र.क्र.१४०/पापु-२३, दि. २० मे, २०१६**
४) **शासन निर्णय, पा.पु.व स्व.वि. क्रमांकः बजेट-२०१६/प्र.क्र.१४०/पापु-२३, दि. १६ जुलै, २०१६**
५) **शासन निर्णय,पा.पु.व स्व.वि.क्रमांकः बजेट-२०१६/प्र.क्र.१४०/पापु-२३,दि.२४ ऑगस्ट, २०१६**
६) **शासन निर्णय,पा.पु.व स्व.वि.क्रमांकः बजेट-२०१६/प्र.क्र.१४०/पापु-२३,दि.७ जानेवारी, २०१७**
७) **शासन परिपत्रक,वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३,दि.८ फेब्रुवारी, २०१७**
८) **शासन निर्णय,पा.पु.व स्व.वि.क्रमांकः बजेट-२०१६/प्र.क्र.१४०/पापु-२३,दि. ९ मार्च, २०१७**

**प्रस्तावना :-**

सन २०१६-२०१७ साठी महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१६ ( महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम, २०१६ च्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) यास विधानमंडळाने मंजूरी दिली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिली असल्याचे वित्त विभागाने वाचा मधील अनुक्रमांक २ च्या परिपत्रकान्वये कळविले आहे.

२. जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वर्ग १ व वर्ग २ च्या अधिका-यांचे वेतन व वेतनेतर खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२ “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१)(०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या

अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (२२१५ १८४३)" या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष सन २०१६-१७ करिता ०१, वेतन यासाठी रुपये २७,४१,००,०००/-(अक्षरी रुपये सत्तावीस कोटी एकेचाळीस लाख फक्त) व ११, देशांतर्गत प्रवास खर्चासाठी रुपये ९२,७१,०००/- (अक्षरी रुपये ब्याण्णव लाख एकाहत्तर हजार फक्त ) असे एकूण रुपये २८,३३,७१,०००/- (अक्षरी रुपये अठ्ठावीस कोटी तेहतीस लाख एकाहत्तर हजार फक्त) इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

३. जिल्हा परिषदांना वरीलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानापैकी ०१, वेतन साठी रुपये २७,४१,००,०००/-(अक्षरी रुपये सत्तावीस कोटी एकेचाळीस लाख फक्त) इतके अनुदान वाचा मधील अनुक्रमांक ३, ४, ५, व ६ च्या शासन निर्णयान्वये व ११,देशांतर्गत प्रवास खर्चासाठी रुपये ८१,२२,६००/- (अक्षरी रुपये एक्याऐंशी लाख बावीस हजार सहाशे फक्त ) इतके अनुदान वाचा मधील अनुक्रमांक ५ व ८ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आले आहेत.

४. आता काही जिल्हा परिषदांनी त्यांना वितरित केलेल्या रक्कमेपैकी वेतनासाठीचे रुपये ४३,२७,२१३/- (अक्षरी रुपये त्रेचाळीस लाख सत्तावीस हजार दोनशे तेरा फक्त) इतके अनुदान समर्पित केले आहे. वेतनासाठीचे सदर अनुदान व देशांतर्गत प्रवास खर्चासाठीचे रुपये २,२१,३००/- (अक्षरी रु.दोन लाख एकवीस हजार तीनशे फक्त ) असे एकूण रुपये ४५,४८,५१३/-(अक्षरी रुपये पंचेचाळीस लाख अठ्ठेचाळीस हजार पाचशे तेरा फक्त) इतके अनुदान वितरणासाठी अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध असून, सदर अनुदान याबाबतची अतिरिक्त मागणी असलेल्या जिल्हा परिषदांना वितरीत करण्याचे प्रस्तावित आहे. सद्यस्थितीत जिल्हा परिषद, रत्नागिरी, जळगाव व जालना यांचेकडून ०१, वेतन करीता व जिल्हा परिषद, कोल्हापूर, उस्मानाबाद व अमरावती यांचेकडून ११, देशांतर्गत प्रवास करीता अतिरिक्त मागण्या प्राप्त झाल्या असून त्यांच्या मागणीच्या अनुषंगाने त्यांना ०१, वेतन साठी व ११, देशांतर्गत प्रवास खर्च यासाठी एकूण रुपये ४५,४८,५१३/-(अक्षरी रुपये पंचेचाळीस लाख अठ्ठेचाळीस हजार पाचशे तेरा फक्त) इतके अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय:-

सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षासाठी "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१)(०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (२२१५ १८४३)" या लेखाशिर्षाखाली जिल्हा परिषद ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वर्ग १ व वर्ग २ च्या अधिका-यांचे ०१, वेतन व ११, देशांतर्गत प्रवास खर्च भागविण्यासाठी या शासन निर्णयासोबतच्या "विवरणपत्र अ" मधील स्तंभ ६ मध्ये दर्शविल्यानुसार आता एकूण अनुदान ४५,४८,५१३/-(अक्षरी रुपये पंचेचाळीस लाख अठ्ठेचाळीस हजार पाचशे तेरा

फक्त) संबंधित मुख्य लेखा व वित्त अधिकारी, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद यांना मंजूर करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र 'अ' मधील स्तंभ क्रमांक ६ मध्ये दर्शविण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याचीही दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरीत केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याची खात्री करुनच पुढील आर्थिक वर्षासाठी आवश्यक निधीची मागणी करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या लेखानुदानातून होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१)(०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (२२१५ १८४३)" ०१, वेतन व ११, देशांतर्गत प्रवास खर्च या लेखाशिर्षामधून आर्थिक वर्ष सन २०१६-२०१७ साठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/ अर्थ-३, दिनांक २० एप्रिल,२०१६ व क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक ८फेब्रुवारी, २०१७ अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२९१८३८५०७३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish V Kove

Digitally signed by Satish V Kove
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=W.S.S.D., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, cn=Satish V Kove
Date: 2017.03.30 18:16:31 +05'30'

**सतीश वि. कोवे**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विधानसभा / विधान परिषद, सर्व
२. अ.मु.स./प्र.स./सचिव,सर्व,मंत्रालय,मुंबई.

३. विभागीय आयुक्त,
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
६. संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पुणे
७. सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
८. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, रत्नागिरी, जळगाव, जालना,कोल्हापूर, उस्मानाबाद व अमरावती
९. प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
१०. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व
११. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
१२. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४. उप अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा उप विभाग, जिल्हा परिषद, सर्व
१५. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१६. वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१९)
१७. कार्यासन क्रमांक पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१८. ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१९. निवड नस्ती कार्यासन पापु-२३

विवरणपत्र -अ

शासन निर्णय क्रमांक बजेट-२०१६/प्र.क्र.१४०/पापु-२३, दिनांक ३० मार्च, २०१७ सोबतचे सहपत्र

| अ. क्र. | जिल्ह्याचे नांव | लेखाशीर्ष २२१५ १८४३ खाली यापूर्वी वेतनासाठी वितरीत अनुदान | सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षामध्ये या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेले अनुदान | | | या शासन निर्णयान्वये लेखाशीर्ष २२१५ १८४३ खाली वितरीत करण्यात येत असलेली एकूण रक्कम (अक्षरी रुपये) |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | वेतन | देशांतर्गत प्रवास खर्च | वितरीत करण्यात येत असलेली एकूण रक्कम (४+५) | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | रत्नागिरी | ७५७२००० | ७२८७३७ | ० | ७२८७३७ | रूपये सात लाख अठ्ठावीस हजार सातशे सदतीस फक्त |
| २ | जळगांव | ६६२३००० | ८८७८०९ | ० | ८८७८०९ | रूपये आठ लाख सत्याऐंशी हजार आठशे नऊ फक्त |
| ३ | कोल्हापूर | ११८५५००० | ० | ७६३०० | ७६३०० | रूपये श्याहत्तर हजार तीनशे फक्त |
| ४ | जालना | ८८५५००० | २७१०६६७ | ० | २७१०६६७ | रूपये सत्तावीस लाख दहा हजार सहाशे सदुसष्ठ फक्त |
| ५ | उस्मानाबाद | ७७४१००० | ० | ३०००० | ३०००० | रूपये तीस हजार फक्त |
| ६ | अमरावती | १३६९१००० | ० | ११५००० | ११५००० | रूपये एक लाख पंधरा हजार फक्त |
| | एकूण | ५६३३७००० | ४३२७२१३ | २२१३०० | ४५४८५१३ | रूपये पंचेचाळीस लाख अठ्ठेचाळीस हजार पाचशे तेरा फक्त |

Satish V Kove

Digitally signed by Satish V Kove
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=W.S.S.D., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, cn=Satish V Kove
Date: 2017.03.30 18:17:03 +05'30'

(सतीश वि. कोवे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन